“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एकछत्र योजनेंतर्गत “चाणक्य सेंटर फॉर एक्सलन्स” निर्मितीकरीता निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२३ /प्र.क्र.७८१/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २९ मार्च, २०२४

**वाचा :-** १) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन पत्र क्र.संकिर्ण-८२२२/प्र.क्र.४१३/सां.का.४, दिनांक १७ फेब्रुवारी, २०२३
२) पर्यटन विभाग शासन निर्णय क्र. टिडीएस-२०२३/०६/प्र.क्र.११४(भाग-३)/पर्यटन, दिनांक ४ डिसेंबर, २०२३

**प्रस्तावना :-**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत स्थापन करण्यात आलेल्या कोअर समितीच्या दिनांक ५ डिसेंबर, २०२२ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त उपर्निर्दिष्ट क्र.१ च्या पत्रान्वये निर्गमित करण्यात आले आहे. सदर इतिवृत्तानुसार “स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” निमित्त “चाणक्य सेंटर फॉर एक्सलन्स” निर्मितीकरीता पर्यटन विभागास निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

उपर्निर्दिष्ट क्र. २ अन्वये दिलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने पर्यटन विभागास “चाणक्य सेंटर फॉर एक्सलन्स” निर्मितीकरीता येणाऱ्या खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

“स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव” साठीच्या एकछत्र योजनेंतर्गत कार्ला, जि.पुणे येथे महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाच्या जागेवर “चाणक्य सेंटर फॉर एक्सलन्स” उभारणेकरीता रुपये २५.०० कोटी (अक्षरी रुपये पंचवीस कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र. झेडड-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती , (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव, (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत कार्यक्रम (२२०५ ३७३३) - ५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना निधी वितरणासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, त्यांना संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबई यांचे कार्यालयातील अधिकारी यांना नियंत्रण अधिकारी घोषित करण्याचे

अधिकार प्रदान करण्यात येत आहे. संबंधित नियंत्रण अधिकारी यांनी प्राधिकृत केलेले अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

संचालक, पर्यटन संचालनालय, मुंबई यांनी सदर प्रयोजनार्थाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत शासनास सादर करावे. तसेच, वेळोवेळी प्रगती अहवाल संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्या मार्फत शासनास सादर करण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२५०-२०२४/व्यय १५, दि. २० मार्च, २०२४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, पर्यटन संचालनालय यांची राहील. तसेच, संचालक, पर्यटन संचालनायल यांनी सदर काम पूर्ण झाल्यानंतर त्यावरील खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचेमार्फत शासनास सादर करावे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०३२९१४२६१४२८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MAHESH KISAN WAVHAL

Digitally signed by MAHESH KISAN WAVHAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=a5f6330d58102c34226358d9eb88eeaac75f0fd9db44b648fc5f6dc90d3ca6a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=495C75B4C173C81F308BD63A1B33A5DA4EA131ED182D44EA1B502AB4662E9810, cn=MAHESH KISAN WAVHAL
Date: 2024.03.29 14:35:45 +05'30'

**( महेश किसन वाव्हळ )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मातथा अध्यक्ष कोअर समिती यांचे खाजगी सचिव (सांस्कृतिक कार्य) मंत्री ., मंत्रालय, मुंबई
२. सर्व सन्माननिय कोअर समिती सदस्य
३. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४. सचिव, पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. उप सचिव व अर्थसंकल्प ४.का.सां )) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय
६. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, मुंबई
७. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०. महालेखापाल - (लेखा परीक्षा)१ महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल महाराष्ट्र २ - (लेखा परीक्षा), नागपूर
१२. महालेखापाल महाराष्ट्र १ - (लेखा अनुज्ञेयता), मुंबई
१३. महालेखापाल -(लेखा व अनुज्ञेयता)२ महाराष्ट्र, नागपूर
१४.निवड नस्ती, सां.का.४.